**महाराष्ट्र राज्य मुक्त विद्यालय मंडळाची भूमिका, विषययोजना व इतर तरतुदी.**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः ममुवि-२०१६/प्र.क्र.०८/एस.डी.२**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक : २१ डिसेंबर, २०१८.

<u>संदर्भ</u> :- शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय क्र. ममुवि २०१६/प्र.क्र.०८/ एस.डी-२, दि.१४ जुलै,२०१७.

**<u>प्रस्तावना-</u>**

राष्ट्रीय शैक्षणिक धोरण १९८६ आणि त्या अनुषंगाने प्रसिध्द करण्यात आलेल्या कृती आराखड्यामध्ये मुक्त शिक्षणावर भर देण्यात आलेला आहे. तद्‌नंतरही वारंवार अनेक शिक्षण तज्ज्ञ, संस्था यांचेकडून व्यवसायाभिमुख दूरस्थ शिक्षण आणि मुक्त शिक्षण यांची महत्वपूर्ण भूमिका अधोरेखित करण्यात आलेली आहे. मुक्त शिक्षणाची गरज जगातील अनेक देशांनी ओळखली असून त्यांनी मुक्त शिक्षणाची कल्पना स्वीकारलेली आहे.

केंद्र शासनाच्या मानव संसाधन विकास मंत्रालयाने राष्ट्रीय मुक्त शिक्षण संस्था (National Institute of Open Schooling - NIOS) ही स्वतंत्र यंत्रणा निर्माण करुन १९८९ मध्ये मुक्त शिक्षणाचा पाया घातला. सध्या राष्ट्रीय मुक्त शिक्षण संस्थेची देशभरात ११ विभागीय केंद्रे, तीन उपविभागीय केंद्रे, तीन हजार संलग्न संस्था (AIS) आणि व्यावसायिक संस्था (AVIS) कार्यरत आहेत. या तीन हजार अभ्यास केंद्राचे जाळे भारत, नेपाळ आणि मध्य पूर्वेत पसरलेले आहे. असे जरी असले तरीही देशाची एकूण भौगोलिक व्याप्ती आणि प्रादेशिक गरजांचा विचार करता राज्यांनीही स्वत:च्या स्तरावर प्रयत्न करण्याची गरज असल्याने राष्ट्रीय मुक्त शिक्षण संस्था (NIOS) यासाठी सर्व राज्यांना प्रोत्साहन आणि मार्गदर्शन देत आहे. देशात सध्या १५ राज्ये व १ केंद्रशासित प्रदेशामध्ये मुक्त विद्यालये सुरू आहेत.

शिक्षणामुळे मनुष्याच्या विचारांचा पाया भक्कम होतो. शिक्षण ही जीवनाच्या प्रत्येक अंगाला स्पर्श करणारी व पूर्णत्वाकडे नेणारी निरंतर प्रक्रिया आहे. मानवी जीवनाचा सामाजिक व आर्थिक स्तर सुधारण्यात शिक्षणाचे महत्वपूर्ण योगदान आहे.समाजातील प्रत्येक घटकातील मूल शिकले पाहिजे याकरिता अनेक योजना शासनामार्फत राबविण्यात येत आहेत.तरीही अनेक विद्यार्थी शिक्षणापासून वंचित राहत आहेत. तसेच काही दिव्यांग विद्यार्थी मुख्य प्रवाहातील औपचारिक शिक्षण घेण्यास असमर्थ आहेत. अतिप्रगत विद्यार्थ्यांना औपचारिक शिक्षणापलिकडे अनेक विषयांचे पर्याय उपलब्ध करून देणे गरजेचे आहे.

सद्यस्थितीत इयत्ता १ ली ते इयत्ता १० वी पर्यंतच्या शैक्षणिक प्रवासात राज्यातील विद्यार्थ्यांची विविध टप्प्यांवर गळती होत असल्याची बाब निदर्शनास आली आहे. यामध्ये मुलींच्या गळतीचे प्रमाणही लक्षणिय आहे. सदर वस्तुस्थितीचा साकल्याने विचार करून शासनाने संदर्भाधीन शासन निर्णय दि.१४ जुलै, २०१७ व्दारे महाराष्ट्र राज्य मुक्त मंडळाची स्थापना करण्यात आली आहे. सदर शासन निर्णय दि.१४ जुलै,२०१७ मधील धोरणात सुधारणा करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

१. संदर्भाधीन दि.१४ जुलै, २०१७ च्या शासन निर्णयान्वये महाराष्ट्र राज्य मुक्त विद्यालय मंडळ स्थापन करण्यात आले आहे. तथापि सदर शासन निर्णयातील तरतुदी अधिक्रमित करून आवश्यक सुधारणा या शासन निर्णयान्वये करण्यात येत आहेत.

२. यासंदर्भातील सुधारित तरतुदी पुढीलप्रमाणे आहेत.

(२.१) **समकक्षता**- महाराष्ट्र राज्य मुक्त विद्यालय योजनेत प्राथमिक, उच्च प्राथमिक, माध्यमिक शालांत प्रमाणपत्र परीक्षा व उच्च माध्यमिक प्रमाणपत्र परीक्षा यांचा समावेश असेल. सदर परीक्षांना शासनाच्या नियमित परीक्षांची समकक्षता राहील. सदर मुक्त विद्यालय मंडळाचे इ.१० वी आणि इ.१२ वी उत्तीर्ण विद्यार्थी हे राज्य मंडळाच्या इ.१० वी व इ.१२ वी प्रमाणपत्र परीक्षांशी समकक्ष राहतील. तसेच सदर समकक्षता शासनाच्या उच्च शिक्षण व रोजगाराच्या उपलब्ध असणाऱ्या संधीसाठीही लागू राहील.

(२.२) मुक्त विद्यालयाची उद्दिष्टे-

१. औपचारिक शिक्षणाला समकक्ष शिक्षण पध्दती सुरू करणे.
२. शालेय शिक्षणातील गळतीचे प्रमाण कमी करणे.
३. शिक्षण घेऊ इच्छिणारे प्रौढ व्यक्ती, दिव्यांग, गृहिणी, कामगार, खेडाळू या सर्वांना समकक्ष शिक्षणाच्या संधी उपलब्ध करुन देणे.
४. नियमित शालेय वेळेत उपस्थित राहू न शकणाऱ्यांसाठी शिक्षणाची संधी उपलब्ध करुन देणे.
५. स्थानिक स्तरावर विद्यार्थ्यांना सोयीनुसार शिक्षण घेण्याची सुविधा उपलब्ध करुन देणे.

**(२.३) मुक्त विद्यालयाची वैशिष्टये-**

१. सोयीनुसार अध्ययनाची संधी.
२. विषयांची लवचिकता.
३. अतिप्रगत विद्यार्थ्यांना औपचारिक शिक्षणापलीकडे अनेक विषयांचे पर्याय उपलब्ध करुन देणे.
४. अधिकच्या व्यावसायिक विषयांची उपलब्धता.
५. संचित मूल्यांकनाची व्यवस्था (Transfer of Credit)
६. सर्वांसाठी शिक्षणाची व्यवस्था
७. दिव्यांग विद्यार्थ्यांसाठी विशेष विषय योजना.

**(२.४) मुक्त विद्यालयासाठी प्रवेश पात्रता-**

**(अ) प्राथमिक स्तर: इयत्ता ५ वी (समकक्ष)**

१. नोंदणी करतांना उमेदवाराचे वय १० वर्ष पूर्ण असावे. कमाल वयाची अट नाही.
२. वयाचा दाखला सादर करावा लागेल. (वयाचा दाखला उपलब्ध नसल्यास वयाबाबतचे

पालकांचे प्रतिज्ञापत्र सादर करावे लागेल)

३. औपचारिक शाळेत गेला नसेल, तर स्वयंघोषित प्रमाणपत्र (वय वर्षे १८ पेक्षा जास्त असल्यास) द्यावे लागेल.

४. औपचारिक शाळेत गेला नसल्याबाबतचे पालकांचे प्रतिज्ञापत्र (वय वर्षे १८ पेक्षा कमी असल्यास) द्यावे लागेल.

५. इयत्ता ५ वी मध्ये ज्या विद्यार्थ्याचे वय १४ वर्षांपेक्षा कमी आहे अशा विद्यार्थ्यांना संपर्क केंद्रामध्ये मुक्त शाळेचे नियमित विद्यार्थी म्हणून नोंदणी करावी लागेल.

**(ब) उच्च प्राथमिक स्तर: इयत्ता ८ वी (समकक्ष)**

१. नोंदणी करतांना उमेदवाराचे वय १३ वर्षे पूर्ण असावे. कमाल वयाची अट नाही.

२. वयाचा दाखला सादर करावा लागेल. (वयाचा दाखला उपलब्ध नसल्यास वयाबाबतचे पालकांचे प्रतिज्ञापत्र सादर करावे लागते)

३. औपचारिक शाळेत गेला नसेल, तर स्वयंघोषित प्रमाणपत्र (वय वर्षे १८ पेक्षा जास्त असल्यास) द्यावे लागेल.

४. औपचारिक शाळेत गेला नसल्याबाबतचे पालकांचे प्रतिज्ञापत्र (वय वर्षे १८ पेक्षा कमी असल्यास) द्यावे लागेल.

५. इयत्ता ८ वी मध्ये ज्या विद्यार्थ्याचे वय १४ वर्षापेक्षा कमी आहे अशा विद्यार्थ्यांना संपर्क केंद्रामध्ये मुक्त शाळेचे नियमित विद्यार्थी म्हणून नोंदणी करावी लागेल.

**(क) माध्यमिक स्तर: इयत्ता १० वी ( माध्यमिक शालांत परीक्षा समकक्ष )**

१. नोंदणी करतांना उमेदवाराचे वय १५ वर्षं पूर्ण असावे, कमाल वयाची अट नाही.

२. वयाचा दाखला सादर करावा लागेल. (वयाचा दाखला उपलब्ध नसल्यास वयाबाबतचे पालकांचे प्रतिज्ञापत्र सादर करावे लागेल.)

३. उमेदवार किमान इयत्ता ८ वी उत्तीर्ण असावा.

४. उमेदवार किमान दोन वर्षे महाराष्ट्राचा रहिवासी असावा. (रहिवासाचा योग्य पुरावा सादर करावा लागेल. उदा. आधारकार्ड/डोमीसाईल/बँकेचे पासबुक/दूरध्वनी देयक/वीज देयक/नोकरीच्या ठिकाणाचे ओळखपत्र इत्यादी.)

५. इयत्ता ८ वी उत्तीर्ण प्रमाणपत्र सादर करावे.

६. राज्यमंडळाच्या माध्यमिक शालांत प्रमाणपत्र परीक्षेत उत्तीर्ण होऊ न शकलेला उमेदवार मुक्त विद्यालय मंडळाच्या **माध्यमिक शालांत प्रमाणपत्र परीक्षेसाठी** प्रवेशित होऊ शकेल. या विद्यार्थ्यांना TOC (Transfer of Credit) चा फायदा देण्यात येईल. मात्र प्रतिबंधित (डीबार) विद्यार्थ्यांस प्रवेश दिला जाणार नाही.

**(२.५) नोंदणी :**

१. उमेदवार नोंदणी केल्यापासून सहा महिन्यानंतर परीक्षेसाठी पात्र होईल.
२. एकदा केलेली नोंदणी एकाच इयत्तेकरिता पाच वर्षांसाठी वैध राहील. (प्रत्येक इयत्तेसाठी स्वतंत्रपणे नोंदणी करावी लागेल.)
३. या नोंदणीद्वारे एका इयत्तेसाठी सलग पाच वर्षे किंवा सलग नऊ परीक्षांची संधी दिली जाईल.
४. पुनर्नोंदणीची सुविधा उपलब्ध राहील. पुनर्नोंदणीचा कालावधी व परीक्षांची संधी उपरोक्त क्र. १ व २ प्रमाणे राहील.
५. पुनर्नोंदणी केल्यानंतरही यापूर्वीच्या परीक्षेस मिळालेली सूट ग्राह्य धरली जाईल.

**(२.६) अभ्यासक्रमः-**

१. महाराष्ट्र राज्य शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण परिषद (विद्याप्राधिकरण), पुणे आणि महाराष्ट्र राज्य पाठयपुस्तक निर्मिती व अभ्यासक्रम संशोधन मंडळ (बालभारती), पुणे, यांचेमार्फत इयत्ता १ ली ते १० वी साठी निश्चित केलेल्या विषय योजनेतील विषयांसाठी त्यांनी तयार केलेला अभ्यासक्रम व पाठयपुस्तके लागू राहतील.
२. National Skill Qualification Framework (NSQF) अंतर्गत विषयांसाठी PSSCIVE, Bhopal (MP) ने तयार केलेला अभ्यासक्रम व पाठयपुस्तके वापरण्यात येतील.
३. इयत्ता ५ वी, ८ वी व १० वी साठी कला विषयांतर्गत (१) सृजनात्मक कला निर्मिती-(चित्रकला,हस्तकला,रंगकाम) (२) भारतीय संगीत (गायन,वादन,नृत्य) (३) गृहोपयोगी व शालोपयोगी साहित्य निर्मिती (दिव्यांगांसाठी) यांचा अभ्यासक्रम व स्वयंअध्ययन साहित्य महाराष्ट्र राज्य मुक्त विद्यालय मंडळामार्फत तयार करण्यात येतील.

**(२.७) विषययोजना - विषयांची निवड करण्यासाठी मार्गदर्शक सूचना-**

१. विद्यार्थी सर्व पाच विषयांमध्ये उत्तीर्ण होणे आवश्यक आहे. विद्यार्थी इयत्ता १० वी मध्ये ज्या विषयात उत्तीर्ण झाला असेल त्या विषयातच पुढील कनिष्ठ महाविद्यालयीन स्तरावरील शिक्षण घेण्यासाठी पात्र ठरु शकतो.

**उदा:-** पुढील शिक्षणासाठी विज्ञान शाखेत प्रवेश घ्यावयाचा असल्यास इयत्ता १०वी मध्ये विज्ञान, इंग्रजी व गणित विषय घेणे अनिवार्य असेल.

२. मुक्त विद्यालय मंडळाच्या इंग्रजी विषयाशिवाय इयत्ता १० वी उत्तीर्ण होणारा विद्यार्थी हा मुक्त विद्यालय मंडळाच्या इयत्ता १२ वी प्रवेशासाठी पात्र असेल. तसेच हा विद्यार्थी राज्य मंडळाच्या इ.११ वी प्रवेशासाठी पात्र राहील.यानुषंगाने आवश्यक सुधारणा राज्यमंडळ नियमावलीमध्ये करण्यात येईल.

३. प्राथमिक, उच्च प्राथमिक व माध्यमिक स्तरावर निर्धारित भाषांपैकी कोणत्याही दोन भाषा विषय घेणे अनिवार्य राहील.

४. **प्राथमिक, उच्च प्राथमिक व माध्यमिक स्तरावरील विषययोजना परिशिष्ट -१ मध्ये देण्यात आली आहे.**

५. परिशिष्ट-१ मध्ये नमूद प्राथमिक, उच्च प्राथमिक व माध्यमिक स्तरावरील विषय योजनेमध्ये शासनमान्यतेने बदल करता येतील

(२.८) <u>परीक्षा पध्दती व मूल्यमापन</u>:-

**(अ) प्राथमिक स्तर (ब) उच्च प्राथमिक स्तर-**

शिक्षण हक्क कायद्यानुसार (R.T.E) मूल्यमापन पध्दती राहील.

**क) माध्यमिक स्तर-**

१. भाषा विषयांकरिता १०० गुणांची अंतिम लेखी परीक्षा राहील.
२. गणित विषयासाठी लेखी परीक्षा ८० गुण+ अंतर्गत मूल्यमापन २० गुणांचे राहील.
३. विज्ञान व तंत्रज्ञान विषयाची लेखी परीक्षा ८० गुण + प्रात्यक्षिक परीक्षा २० गुणांची राहील.
४. इतिहास व राज्यशास्त्र विषयाकरिता लेखी परीक्षा ६० गुण (इतिहास ४० + राज्यशास्त्र २०) तसेच भूगोल विषयाकरिता लेखी परीक्षा ४० गुणांची राहील.
५. NSQF विषयांसाठी संबधित यंत्रणेकडून वेळोवेळी प्राप्त होणाऱ्या निर्देशानुसार.
६. कला विषय गटातील विषयांना लेखी परीक्षा ५० गुणांची व प्रात्यक्षिक परीक्षा ६० गुणांची राहील.
७. विद्यार्थ्याला विषय योजनेनुसार ५ विषय घेणे अनिवार्य राहील.
८. सर्व ५ विषयांत उत्तीर्ण झाल्यासच उत्तीर्णतेचे प्रमाणपत्र मिळेल.
९. महाराष्ट्र राज्य मुक्त विद्यालय मंडळाचे माध्यम मराठी, इंग्रजी व उर्दू राहील.
१०.सर्व विषयांची परीक्षा एकाच वेळी देण्याचे बंधन असणार नाही. पाच वर्षात एकूण नऊ परीक्षांना हव्या त्या विषयांना परीक्षार्थी प्रविष्ट होऊ शकेल.
११.दरवर्षी जून व डिसेंबर असे वर्षातून दोन वेळा परीक्षेचे आयोजन करण्यात येईल. या परीक्षा विविध पाठयांशावर (Modules) देता येतील. संचित मूल्यांकनाची (Transfer of Credit) व्यवस्था असेल.
१२. मूल्यमापन योजना मुक्त विद्यालय मंडळाने वेळोवेळी निश्चित केलेल्या धोरणांनुसार राहील.

(२.९) <u>नोंदणी शुल्क, परीक्षा शुल्क, अनुषंगिक इतर शुल्क व मानधनाचे दर</u>-

उपरोक्त बाबींचे दर महाराष्ट्र राज्य मुक्त विद्यालय मंडळ वेळोवेळी निश्चित करेल त्याप्रमाणे राहतील.

(२.१०) <u>प्रशासकीय संरचना व व्यवस्थापन</u>

माध्यमिक राज्य मुक्त विद्यालय मंडळ योजनेसाठी राज्य पातळीवर अध्यक्ष म्हणून महाराष्ट्र राज्य माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षण मंडळाचे अध्यक्ष राहतील. इतर अधिकारी/कर्मचारी वर्ग प्रतिनियुक्ती/

कंत्राटी तत्वार आवश्यकतेप्रमाणे नियुक्त करण्याचा अधिकार महाराष्ट्र राज्य माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षण मंडळास शासन मान्यतेने राहील.

या योजनेची योग्यरितीने अंमलबजावणी करण्यासाठी खालीलप्रमाणे यंत्रणा राहील.

**(अ) नियामक मंडळ**

| | | |
|---|---|---|
| १) | अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षण मंडळ, पुणे | -अध्यक्ष |
| २) | अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य मुक्त विद्यालय मंडळ, पुणे | -सह अध्यक्ष |
| ३) | सहसचिव/उपसचिव अथवा प्रतिनिधी, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई | -सदस्य |
| ४) | शिक्षण संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे | -सदस्य |
| ५) | शिक्षण संचालक, (प्राथमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे | -सदस्य |
| ६) | संचालक, महाराष्ट्र राज्य शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण परिषद (विद्याप्राधिकरण), पुणे | -सदस्य |
| ७) | संचालक, महाराष्ट्र राज्य पाठ्यपुस्तक मंडळ (बालभारती), पुणे | -सदस्य |
| ८) | सहसंचालक, राष्ट्रीय मुक्त शालेय शिक्षण संस्था (NIOS), पुणे विभाग | -सदस्य |
| ९) | यशवंतराव चव्हाण महाराष्ट्र मुक्त विद्यापीठ (YCMOU) आणि इंदीरा गांधी राष्ट्रीय मुक्त विद्यापीठ( IGNOU) संस्थेचे प्रत्येकी एक प्रतिनिधी | -सदस्य |
| १०) | राज्य समन्वयक, महाराष्ट्र राज्य मुक्त विद्यालय मंडळ, पुणे | -सदस्य |
| ११) | सचिव, महाराष्ट्र राज्य मुक्त विद्यालय मंडळ, पुणे | -सदस्य सचिव |

- सदर समितीच्या वर्षातून किमान दोन सभा होतील.

**कार्य-**

१. धोरणात्मक निर्णय घेणे.
२. तज्ज्ञ समिती/अभ्यासमंडळांनी तयार केलेले स्वयंअध्ययन साहित्य, स्वाध्यायपत्रिका, शैक्षणिक साहित्य इ. मान्यता देणे.
३. प्रशासकीय व वित्तीय धोरणात्मक निर्णय घेणे.
४. मूल्यमापन योजना अंतिम करणे.
५. शिक्षकांसाठी प्रशिक्षण धोरण निश्चित करणे.

**(ब) कार्यकारी समिती:-**

| | | |
|---|---|---|
| १. | अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षण मंडळ, पुणे. | - अध्यक्ष |
| २. | अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य मुक्त विद्यालय मंडळ, पुणे | - सह अध्यक्ष |
| ३. | शिक्षण संचालक, (माध्यमिक व उच्च माध्यमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे | - सदस्य |
| ४. | शिक्षण संचालक, (प्राथमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे | - सदस्य |
| ५. | संचालक, महाराष्ट्र राज्य शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण परिषद (विद्याप्राधिकरण), पुणे | - सदस्य |
| ६. | संचालक, महाराष्ट्र राज्य पाठ्यपुस्तक मंडळ (बालभारती), पुणे | - सदस्य |

७. राज्य समन्वयक, महाराष्ट्र राज्य मुक्त विद्यालय मंडळ, पुणे - सदस्य
८. दिव्यांग/कला /क्रिडा यांचेशी संबधित संस्थांचे प्रत्येकी २ प्रतिनिधी - सदस्य
९. सचिव, महाराष्ट्र राज्य मुक्त विद्यालय, पुणे - सदस्य सचिव

- अशासकीय सदस्यांचा कालावधी ३ वर्षाचा असेल. अशासकीय सदस्यांची नेमणूक शासन करेल. सदर समितीच्या वर्षातून किमान चार बैठका होतील. तसेच अध्यक्षांना आवश्यक वाटेल तेव्हा बैठक बोलविता येईल.

**कार्य-**

१. महाराष्ट्र राज्य मुक्त विद्यालय मंडळाचे वित्त, लेखे आणि गुंतवणूक यांची व्यवस्था पाहणे व त्यांचे नियमन करणे.
२. महाराष्ट्र राज्य मुक्त विद्यालय मंडळाचे वार्षिक, सुधारित आणि पुरवणी अंदाजपत्रक आणि जमाखर्चाचे वार्षिक लेखे आणि महाराष्ट्र राज्य मुक्त विद्यालय मंडळाच्या वित्त समितीच्या त्यावरील शिफारशी यांवर विचार करणे आणि नियामक मंडळास सादर करणे.
३. महाराष्ट्र राज्य मुक्त विद्यालय मंडळासाठी कामावर नियुक्त करावयाचे अधिकारी/कर्मचारी वर्ग यांची संख्या निश्चित करून ती पदे भरण्याबाबत नियामक मंडळास शिफारस करणे.
४. महाराष्ट्र राज्य मुक्त विद्यालय मंडळाच्या कार्याशी संबंधित त्यास योग्य वाटेल अशा किंवा अध्यक्ष त्याकडे विचारार्थ पाठवील अशा कोणत्याही बाबींवर अध्यक्षास सर्वसाधारणपणे सल्ला देणे.
५. महाराष्ट्र राज्य मुक्त विद्यालय मंडळाकडून ज्या कोणत्याही बाबींवर मते मागविण्यात येतील किंवा त्या बाबतीत महाराष्ट्र राज्य मुक्त विद्यालय मंडळास सल्ला द्यावा असे वाटेल त्या बाबींसंबंधी नियामक मंडळास कळविणे.
६. महाराष्ट्र राज्य मुक्त विद्यालय मंडळाच्या विद्या समितीमधून आलेला कोणताही प्रस्ताव शिफारस किंवा अहवाल स्वीकारणे, तो नाकारणे किंवा त्यावर काही पृच्छा करुन तो परत पाठविणे.

**(क) विद्या समिती:-**

१. अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षण मंडळ, पुणे -अध्यक्ष
२. अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य मुक्त विद्यालय मंडळ, पुणे -सह अध्यक्ष
३. संचालक, महाराष्ट्र राज्य पाठ्यपुस्तक मंडळ (बालभारती), पुणे -सदस्य
४. संचालक, महाराष्ट्र राज्य शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण (विद्याप्राधिकरण), पुणे -सदस्य
५. संचालक, तंत्रशिक्षण, मुंबई यांचे प्रतिनिधी -सदस्य
६. अभ्यासक्रम विभाग प्रमुख, एस.सी.इ.आर.टी. (विद्याप्राधिकरण), पुणे -सदस्य
७. सर्व विषय अभ्यास मंडळाचे अध्यक्ष -सदस्य
८. यशवंतराव चव्हाण महाराष्ट्र मुक्त विद्यापीठ (YCMOU) आणि इंदीरा गांधी राष्ट्रीय मुक्त विद्यापीठ (IGNOU) संस्थेचे प्रत्येकी एक प्रतिनिधी -सदस्य

९. राज्य समन्वयक, महाराष्ट्र राज्य मुक्त विद्यालय मंडळ, पुणे. -सदस्य

१०.सचिव, महाराष्ट्र राज्य मुक्त विद्यालय मंडळ, पुणे -सदस्य सचिव

**कार्य:-**

१. महाराष्ट्र राज्य मुक्त विद्यालय मंडळाच्या प्राथमिक, उच्च प्राथमिक, माध्यमिक आणि उच्च माध्यमिक स्वरावर स्वयंअध्ययन साहित्य निर्मिती करण्यासाठी मार्गदर्शक तत्वे तयार करणे.

२. महाराष्ट्र राज्य मुक्त विद्यालय मंडळाच्या प्राथमिक, उच्च प्राथमिक, माध्यमिक आणि उच्च माध्यमिक शिक्षणातील सर्व इयत्तांसाठी त्या त्या अभ्यास मंडळानी तयार केलेल्या स्वयंअध्ययन साहित्यावर तपशिलवार विचार करणे आणि त्यावरही आपल्या शिफारशी कार्यकारी समितीस सादर करणे.

३. महाराष्ट्र राज्य मुक्त विद्यालय मंडळाच्या प्राथमिक, उच्च प्राथमिक, माध्यमिक आणि उच्च माध्यमिक संबंधित अभ्यास मंडळाच्या शिफारशींबाबत योग्य वाटतील अशा कोणत्याही अटी व शर्तीस अधिन राहून सर्व इयत्तासाठी स्वयंअध्ययन साहित्य तयार करुन घेणे आणि मंजूरीसाठी कार्यकारी समितीमार्फत नियामक मंडळास शिफारस करणे.

४. स्वयंअध्ययन साहित्य, शिक्षण व परीक्षा पध्दती यांचे मूल्यमापन व सुधारणा यांची कार्यकारी समितीला शिफारस करणे.

५. अभ्यास मंडळाच्या कार्यात समन्वय साधणे आणि प्रत्येक अभ्यास मंडळाशी संबंधित अशा वेगवेगळया बाबींबाबत त्यांच्या शिफारशीची छाननी करणे.

६. अंतिम परीक्षांशी संबंधित असलेल्या अभ्यास मंडळाच्या शिफारशींबाबत खालील बाबींवर विचार करुन त्यावरील आपल्या शिफारशी कार्यकारी समितीस सादर करणे.

अ) सक्तीच्या आणि ऐच्छिक विषयांची एकूण संख्या

ब) नवीन विषय सुरू करणे व विद्यमान विषय वगळणे यासंबंधीचे प्रस्ताव.

क) विषयाचे गट पाडणे व अशा गटात फेरबदल करणे.

ड) परीक्षा व मूल्यमापन विषयक धोरणात्मक आवश्यक बदलासाठी कार्यकारी समितीकडे शिफारस करणे.

**(२.११) <u>अभ्यास मंडळ</u>**

महाराष्ट्र राज्य मुक्त विद्यालय मंडळासाठी इयत्ता ५ वी, ८ वी, १० वी, व १२ वी साठी स्वयंअध्ययन साहित्याची निर्मिती करण्यासाठी महाराष्ट्र राज्य शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण (विद्याप्राधिकरणे), पुणे व महाराष्ट्र राज्य पाठयपुस्तक मंडळ (बालभारती), पुणे या कार्यालयातील प्रचलित अभ्यास मंडळातील विषयतज्ज्ञ, सदस्यांमधून काही निवडक तज्ज्ञांना/ सदस्यांना निमंत्रित करण्याचे अधिकार अध्यक्ष, मुक्त विद्यालय मंडळ यांना राहतील.

(२.१२) **अध्ययन साहित्य**

मुक्त विद्यालय मंडळामार्फत निश्चित करण्यात आलेल्या विषयांसाठी आवश्यकतेनुसार वेळोवेळी स्वयंअध्ययन साहित्य निर्मिती केली जाईल.

३. इयत्ता १२ वी संदर्भातील प्रवेश पात्रता, विषययोजना, परीक्षा पध्दती व मूल्यमापन तसेच अनुषंगिक तरतुदींबाबत स्वतंत्रपणे निर्देश देण्यात येतील.

४. महाराष्ट्र राज्य मुक्त विद्यालय मंडळ स्थापन करण्याच्या प्रस्तावास मंत्रिमंडळाची मंजूरी मिळालेली आहे. या योजनेची अंमलबजावणी करण्याकरिता मुक्त विद्यालय केंद्र स्थापन करणे, अध्ययन साहित्य निर्माण करणे आदी. बाबींसंदर्भातील नियमावली, मार्गदर्शक सूचना या राज्य मंडळाने (महाराष्ट्र राज्य माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षण मंडळ) तयार कराव्यात.

५. महाराष्ट्र राज्य मुक्त विद्यालय मंडळ हे राज्य मंडळाचा एक भाग म्हणून कार्यान्वित राहील. सद्यस्थितीत राज्य मंडळाकडे असणारे मनुष्यबळ, भौतिक सुविधा व उपलब्ध निधी यांच्या आधारेच महाराष्ट्र राज्य मुक्त विद्यालय मंडळ स्थापन करण्यात यावे. नोंदणी शुल्कामुळे प्राप्त होणाऱ्या नीधीतून भविष्यामध्ये राज्य मुक्त विद्यालय मंडळ आर्थिकदृष्टया स्वयंपूर्ण होईल. यादृष्टीने राज्य मंडळाने नियोजन करावे. राज्य मुक्त विद्यालय मंडळामुळे राज्य शासनावर कोणताही आर्थिक बोजा पडणार नाही, अथवा नव्याने दायित्व निर्माण होणार नाही.

६. महाराष्ट्र राज्य मुक्त विद्यालय मंडळाबाबतीत वेळोवेळी आवश्यक निर्णय घेण्याचे अधिकार शालेय शिक्षण विभागास राहतील.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्र. २०१८१२२०१३२७५१८१२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Suvarna Siddharth Kharat

Digitally signed by Suvarna Siddharth Kharat
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=School Education And Sports Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=065279b98828b1456ad0d62a97fa45eee948af8abe5a27104d4e132c5bd1d93a, cn=Suvarna Siddharth Kharat
Date: 2018.12.21 15:21:53 +05'30'

( डॉ.सुवर्णा सि.खरात )
सह सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,

१. मा.विरोधी पक्षनेता, महाराष्ट्र विधानसभा,विधानभवन, मुंबई
२. मा.विरोधी पक्षनेता, महाराष्ट्र विधानपरिषद, विधानभवन, मुंबई.
३. सर्व माननीय सदस्य महाराष्ट्र विधानसभा / विधानपरिषद, विधानभवन, मुंबई
४. मा.राज्यपालांचे सचिव, राजभवन, मुंबई
५. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
६. मा. मंत्री (शालेय शिक्षण व क्रीडा) यांचे विशेष कार्य अधिकारी, मंत्रालय, मुंबई

७. मा. शिक्षण आयुक्त, महाराष्ट्र राज्य, पुणे.
८. शिक्षण संचालक, (माध्यमिक व उच्च माध्यमिक) महाराष्ट्र राज्य, पुणे.
९. अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य माध्य. व उच्च माध्य. शिक्षण मंडळ, पुणे.
१०.अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य मुक्त विद्यालय मंडळ,पुणे
११.सचिव, महाराष्ट्र राज्य माध्य. व उच्च माध्य. शिक्षण मंडळ, पुणे.
१२.विभागीय अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य माध्यमिक व उच्च माध्यमिक विभागीय शिक्षण मंडळ (सर्व).
१३.विभागीय सचिव, महाराष्ट्र राज्य माध्यमिक व उच्च माध्यमिक विभागीय शिक्षण मंडळ (सर्व).
१४.सर्व विभागीय शिक्षण उपसंचालक.
१५.सर्व शिक्षणाधिकारी (माध्यमिक)
१६.सर्व गटशिक्षणाधिकारी
१७.सर्व शिक्षण निरीक्षक, मुंबई (पूर्व ,पश्चिम, उत्तर)
१८.निवड नस्ती (एसडी - २).

**शासन निर्णय क्रमांकः ममुवि-२०१६/प्र.क्र. ०८/एस.डी.२**
**दिनांक : २१ डिसेंबर, २०१८ सोबतचे परिशिष्ट.**

## *परिशिष्ट-१.*

### अ) प्राथमिक स्तर- इ.५ वी

| इयत्ता ५ वी (सर्वसाधारण) | | इयत्ता ५ वी (दिव्यांगांकरिता) | |
|---|---|---|---|
| उपलब्ध विषय योजना | निवडावयाचे विषय | उपलब्ध विषय योजना | निवडावयाचे विषय |
| **गट-अ**<br>(१) मराठी<br>(२) हिंदी<br>(३) इंग्रजी<br>(४) संस्कृत<br>(५) उर्दू<br>(६) गुजराती<br>(७) कन्नड | **गट-अ**<br>**कोणतेही दोन भाषा विषय** | **गट-अ**<br>(१) मराठी<br>(२) हिंदी<br>(३) इंग्रजी<br>(४) संस्कृत<br>(५) उर्दू<br>(६) गुजराती<br>(७) कन्नड | **गट-अ**<br>कोणतीही एक किंवा दोन भाषा विषय निवडू शकतो. |
| **गट-ब**<br>१. गणित<br>२. परिसर अभ्यास | **गट-ब**<br>दोन्ही विषय अनिवार्य | **गट-ब**<br>१. गणित<br>२. परिसर अभ्यास | **गट- ब आणि क**<br>कोणतेही तीन किंवा चार विषय<br>(टिप:- गट-अ, ब, आणि क मिळून पाच विषय घेणे अनिवार्य) |
| **गट-क**<br>कला विषय-<br>१. <u>सृजनात्मक कलानिर्मिती</u>-<br>१) चित्रकला<br>२) हस्तकला<br>३) रंगकाम<br>२.<u>भारतीय संगीत</u><br>१) गायन<br>२) वादन<br>३) नृत्य | **गट-क**<br>कोणताही एक विषय | **गट-क**<br>कला-<br>१. गृहोपयोगी व शालोपयोगी साहित्य निर्मिती- दिव्यांगासाठी<br>२. सृजनात्मक कलानिर्मिती-<br>१) चित्रकला<br>२) हस्तकला<br>३) रंगकाम<br>३. भारतीय संगीत-<br>१) गायन<br>२) वादन<br>३) नृत्य | |

## ब) उच्च प्राथमिक स्तर- इ.८ वी

| इयत्ता ८ वी (सर्वसाधारण) | | इयत्ता ८ वी (दिव्यांगांकरिता) | |
|---|---|---|---|
| उपलब्ध विषय योजना | निवडावयाचे विषय | उपलब्ध विषय योजना | निवडावयाचे विषय |
| **गट-अ**<br>(१) मराठी<br>(२) हिंदी<br>(३) इंग्रजी<br>(४) संस्कृत<br>(५) उर्दू<br>(६) गुजराती<br>(७) कन्नड | **गट-अ**<br>**कोणत्याही दोन भाषा** | **गट- अ**<br>(१) मराठी<br>(२) हिंदी<br>(३) इंग्रजी<br>(४) संस्कृत<br>(५) उर्दू<br>(६) गुजराती<br>(७) कन्नड | **गट -अ**<br>**कोणत्याही एक किंवा दोन भाषा विषय** |
| **गट-ब**<br>१. गणित | **गट-ब**<br>गणित विषय अनिवार्य आहे. | **गट-ब**<br>१. गणित<br>२. विज्ञान<br>३. इतिहास व ना.शास्त्र.<br>४. भूगोल | **गट- ब आणि क**<br>कोणतेही तीन किंवा चार विषय |
| **गट-क**<br>(१) विज्ञान<br>(२) इतिहास व नागरिक शास्त्र<br>(३) भूगोल | **गट-क व ड**<br>कोणतेही दोन विषय | | |
| **गट-ड**<br>**NSQF चे विषय**<br>(१) Multi Skill Foundation Course.<br>(२) Automobile service Technician<br>(३) Retail Merchandizing<br>(४) Healthcare- General Duty Assistant<br>(५) Beauty and Wellness<br>(६) Physical Education & Sports<br>(७) Tourism and Travel<br>(८) Agriculture<br>(९) Media & Entertainment<br>(१०) Banking & Financial Services<br>(११) Mechanical Technology<br>(१२) Electrical Technology<br>(१३) Electronics Technology<br>(१४) Electronics and Hardware Installation Technician<br><br>**कला विषय**<br>१) सृजनात्मक कलानिर्मिती-<br>१) चित्रकला<br>२) हस्तकला<br>३) रंगकाम | | **गट-क**<br>**NSQF चे विषय**<br>१. Multi Skill Foundation Course.<br>२. Automobile service Technician<br>३. Retail Merchandizing<br>४. Healthcare- General Duty Assistant<br>५. Beauty and Wellness<br>६. Physical Education & Sports<br>७. Tourism and Travel<br>८. Agriculture<br>९. Media & Entertainment<br>१०. Banking & Financial Services<br>११. Mechanical Technology<br>१२. Electrical Technology<br>१३. Electronics Technology<br>१४. Electronics and Hardware Installation Technician<br>**कला-**<br>१) गृहोपयोगी व शालोपयोगी साहित्य निर्मिती- दिव्यांगासाठी<br><br>२) सृजनात्मक कलानिर्मिती-<br>(१) चित्रकला<br>(२) हस्तकला<br>(३) रंगकाम<br><br>३) भारतीय संगीत-<br>(१)गायन<br>(२) वादन | |

| | | | |
|---|---|---|---|
| २) भारतीय संगीत<br>१) गायन<br>२) वादन<br>३) नृत्य | | (३) नृत्य | |

## क) माध्यमिक स्तर- इ.१० वी

| इयत्ता १० वी (सर्वसाधारण) | | इयत्ता १० वी (दिव्यांगांकरिता) | |
|---|---|---|---|
| उपलब्ध विषय योजना | निवडावयाचे विषय | उपलब्ध विषय योजना | निवडावयाचे विषय |
| **गट-अ**<br>(१) मराठी<br>(२) हिंदी<br>(३) इंग्रजी<br>(४) संस्कृत<br>(५) उर्दू<br>(६) गुजराती<br>(७) कन्नड | **गट-अ**<br>**कोणत्याही दोन भाषा** | **गट- अ**<br>(१) मराठी<br>(२) हिंदी<br>(३) इंग्रजी<br>(४) संस्कृत<br>(५) उर्दू<br>(६) गुजराती<br>(७) कन्नड | **गट-अ**<br>**कोणतीही एक किंवा दोन भाषा विषय** |
| **गट-ब**<br>१) गणित<br>२)विज्ञान<br>३)इतिहास व राज्य शास्त्र<br>४)भूगोल | **गट-ब आणि क**<br>कोणतेही तीन विषय | **गट-ब**<br>१. गणित<br>२. विज्ञान<br>३. इतिहास व राज्यशास्त्र<br>४. भूगोल | **गट- ब आणि क**<br>**कोणतेही तीन किंवा चार विषय** |

| | | | |
|---|---|---|---|
| **गट-क- NSQF चे विषय**<br>(१) Multi Skill Foundation Course.<br>(२) Automobile service Technician<br>(३) Retail Merchandizing<br>(४) Healthcare- General Duty Assistant<br>(५) Beauty and Wellness<br>(६) Physical Education & Sports<br>(७) Tourism and Travel<br>(८) Agriculture<br>(९) Media & Entertainment<br>(१०) Banking & Financial Services<br>(११) Mechanical Technology<br>(१२) Electrical Technology<br>(१३) Electronics Technology<br>(१४) Electronics and Hardware Installation Technician<br>**कला विषय**<br>१.सृजनात्मक कलानिर्मिती-<br>१) चित्रकला २) हस्तकला<br>३) रंगकाम.<br><br>२.भारतीय संगीत<br>१) गायन<br>२)वादन<br>३) नृत्य | | **गट-क- NSQF चे विषय**<br>(१) Multi Skill Foundation Course.<br>(२) Automobile service Technician<br>(३) Retail Merchandizing<br>(४) Healthcare- General Duty Assistant<br>(५) Beauty and Wellness<br>(६) Physical Education & Sports<br>(७) Tourism and Travel<br>(८) Agriculture<br>(९) Media and Entertainment<br>(१०) Banking & Financial Services<br>(११) Mechanical Technology<br>(१२) Electrical Technology<br>(१३) Electronics Technology<br>(१४) Electronics and Hardware Installation Technician<br>**कला विषय-**<br>१) गृहोपयोगी व शालोपयोगी साहित्य निर्मिती- दिव्यांगासाठी<br>२) सृजनात्मक कलानिर्मिती-<br>(१) चित्रकला<br>(२) हस्तकला<br>(३) रंगकाम<br>३) भारतीय संगीत-<br>(१)गायन<br>(२) वादन (३) नृत्य | |